महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व अधिनस्त घटक महाविद्यालये/ प्रक्षेत्र/ संस्था येथील परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्याचा सेवा कालावधीत मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना कुटूंब निवृत्तिवेतन आणि मृत्यु उपदान, रूग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रूग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ती उपदान तसेच, विद्यापीठ सेवेतून निवृत्त झालेल्या/ होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती उपदान अनुज्ञेय करण्याच्या अनुषंगाने कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन परिपत्रक क्रंमाक मपवि DAHD-१२०११/३५/२०२४-AH२ (७५६५०९)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक : १० मार्च, २०२५

**वाचा :-** १) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रंमाक मपवि -२०२३/प्र.क्र.१२४/पदुम-२ (माफसु), दि. २१ जुन, २०२३

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र रानिप्र-२०२३/प्र.क्र.५७/सेवा-४, दि. २४ ऑगस्ट २०२३

३) वित्त विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. रानिप्र-२०२३/प्र.क्र. ५७/सेवा-४, दि.२० नोव्हेंबर,२०२३

**प्रस्तावना:-**

कृषि व पदुम विभाग शासन निर्णय दिनांक २१/०६/२०२३ अन्वये परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्याचा सेवा कालावधीत मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यु उपदान, रूग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रूग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ती उपदान तसेच विद्यापीठ सेवेतून निवृत्त झालेल्या/होणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती उपदानाचा लाभ अनुज्ञेय करण्यात आला आहे. या शासन निर्णयातील परिच्छेद १० मध्ये या अनुषंगाने वित्त विभागाकडून वेळोवेळी देण्यात येणारे आदेश व सुधारणा लागू राहतील असे नमूद आहे. वित्त विभागाने शासन परिपत्रक क्रमाक रानिप्र-२०२३ /प्र.क्र.५७/सेवा-४ दिनांक २४ ऑगस्ट २०२३ व शासन शुध्दीपत्रक क्र. रानिप्र-२०२३/प्र.क्र.५७/सेवा-४ दि. २० नोव्हेंबर, २०२३ अन्वये याबाबतची कार्यपध्दती निश्चित केली आहे. राज्य शासनाच्या वरील शासन परिपत्रकाच्या धर्तीवर महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, व अधिनस्त घटक महाविद्यालये /प्रक्षेत्र /संस्था मधील परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना /राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्यांचा सेवा कालावधीत मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना कृटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यु उपदान, रूग्णता सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्याला रूग्णता निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ति उपदान तसेच, विद्यापीठ सेवेतून निवृत्त झालेल्या /होणाऱ्यांना सेवानिवृत्ती उपदान अनुज्ञेय करण्यासाठी याद्वारे पुढीलप्रमाणे कार्यपध्दती निश्चित करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक :-**

२. कृषी व पदुम विभागाच्या संदर्भीय शासन निर्णयास अनुसरून परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत असलेल्या कर्मचाऱ्याच्या मृत्युपश्चात त्याचे कुटुंबाने संदर्भाधीन शासन निर्णयासोबतच्या नमुना- ३ अन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ प्रमाणे कुटुंब

निवृत्तिवेतनाचा लाभ मिळण्याबाबतच्या विकल्पाची निवड केली असल्यास त्या अनुषंगाने कुटुंब निवृत्तिवेतन आणि मृत्यु उपदान अनुज्ञेय करण्यासाठी सोबत जोडलेल्या परिशिष्ट-१ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

३. परिभाषित अंशदान निवृतिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत **रूग्णता निवृत्त झालेला** कर्मचारी महाराष्ट्र नागरी (निवृत्तिवेतन) नियम,१९८२ अंतर्गत रूग्णता निवृत्तिवेतन मिळण्यास पात्र ठरत असल्यास व सदर कर्मचाऱ्याने संदर्भाधीन शासन निर्णयास अनुसरून रूग्णता निवृत्तिवेतन अनुज्ञेय करणे, या विकल्पाची (नमुना ३ नुसार) निवड केली असल्यास त्यानुषंगाने रूग्णता निवृत्त निवृत्तीवेतन आणि सेवानिवृत्ती उपदान अनुज्ञेय करण्यासाठी सोबत जोडलेल्या परिशिष्ट -२ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

४. परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत **सेवेत असलेल्या कर्मचाऱ्याने** संदर्भाधीन शासन निर्णयास अनुसरून त्यासोबत नमुना-२ अन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ प्रमाणे रूग्णता निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तिवेतनाचा लाभ मिळण्याबाबतच्या विकल्पाची निवड केली असल्यास त्यानुषंगाने रूग्णता निवृत्तीवेतन/ कुटुंब निवृत्तिवेतन आणि सेवानिवृत्ती उपदान/मृत्यु उपदान अनुज्ञेय करण्यासाठी सोबत जोडलेल्या परिशिष्ट-३ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय दिनांक २१/०६/२०२३ नुसार कार्यरत असणाऱ्या ज्या विद्यापीठ कर्मचाऱ्याने त्याचा सेवेत असताना मृत्यु झाल्यास किंवा तो रूग्णता सेवानिवृत झाल्यास यथास्थिती त्याच्या कुटुंबाला कुटुंब निवृत्तीवेतन/त्याला रूग्णता निवृत्तीवेतन अनुज्ञेय करण्याचा विकल्प नमुना-२ मध्ये सादर केला आहे, अशा कर्मचाऱ्याला तो सेवानिवृत होईपर्यंत सदरचा विकल्प बदलण्याची मुभा असेल. कर्मचाऱ्याने वेळोवेळी सादर केलेल्या विकल्पाची नोंद कार्यालय प्रमुखाने कर्मचाऱ्याच्या सेवापुस्तकात तत्परतेने घ्यावी, तसेच सदर विकल्पाची व त्याची नोंद घेतलेल्या सेवापुस्तकाच्या पानाची साक्षांकित सत्यप्रत नियंत्रक (वित्त व लेखा) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांचे मार्फत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA- Protean) यांचे कडे पाठवावी. विकल्प देणे हा कर्मचाऱ्याचा अधिकार असल्यामुळे कर्मचाऱ्याने तो हयात असताना दिलेला विकल्प, त्याच्या मृत्युपश्चात त्याच्या कुंटुबियांना कोणत्याही परिस्थितीत बदलता येणार नाही.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील नियम १३२ मध्ये नमूद केल्यानुसार "शासनाला येणे असलेल्या रकमा" प्रथमत: सेवानिवृत्ती उपदान/मृत्यु उपदान यामधून वसुल करण्यात याव्यात.

७. विद्यापीठ सेवेतून निवृत झालेल्या/होणाऱ्या कर्मचाऱ्यांचा सेवानिवृत्ती उपदानाचा प्रस्ताव सोबतच्या नमुन्यात (Form-I) परिपूर्ण भरून मूळ सेवापुस्तकासह उपदानाच्या मंजूरीसाठी कुलसचिव, मपमविवि, नागपूर कार्यालयास सादर करण्यात यावा. कुलसचिव, मपमविवि, नागपूर कार्यालयाकडून प्रचलित पध्दतीने प्रकरण मंजुर झाल्यानंतर उपदान अदा करण्याबाबत प्राधीकरण आदेश निर्गमीत करण्यासाठी नियंत्रक (वित्त व लेखा) यांचेकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठवावे.

८. याअनुषंगाने वित्त विभागाकडून वेळोवेळी देण्यात येणारे आदेश व सुधारणा लागू राहतील.

हा शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून संगणक सांकेतांक २०२५०३१०१७००००६७०१ असा आहे. हा परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2025.03.10 17:01:00 +05'30'

**(नि. भा. मराळे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
२) प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन विभाग, नागपूर विभाग, नागपूर
३) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
४) नियंत्रक (वित्त व लेखा), महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
७) वित्त विभाग (सेवा ४), मंत्रालय मुंबई ३२.
८) निवड नस्ती.

**कृषी व पदुम विभाग शासन परिपत्रक क्र.: मपवि DAHD-१२०११/३५/२०२४-AH२ (७५६५०९) सोबतचे परिशिष्ट.**

## परिशिष्ट-१

कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक मपवि २०२३/प्रक्र.१२४/पदुम-२ (माफसू) दि.२१ जून २०२३ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदीस अनुसरून परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत कर्मचाऱ्याचे मृत्युपश्चात त्याचे कुंटुबाने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ अंतर्गत कुंटुब निवृत्तीवेतन अनुज्ञेय करणे, या विकल्पाची (नमुना ३ नुसार) निवड केली असल्यास सदर विकल्पास अनुसरून अवलंबवयाची कार्यपध्दती.

**अ) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेले कर्मचारी:-**

**१. परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत अंशदान व त्यावरील जमा व्याजाच्या रकमेचा परतावा करण्यात आलेल्या प्रकरणी अनुसरावयाची कार्यपध्दती :-**

१.१ मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास/कायदेशीर वारसास कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक मपवि २०१९ /प्र.क्र.३०/माफसू, दिनांक १८/०७/२०१९ मधील तरतूदीनुसार सानुग्रह अनुदान रू.१० लक्ष आणि / किंवा कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक मपवि २०१६/ प्र.क्र. २३ / माफसू, दिनांक ३१/०८/२०१७ मधील जोडपत्र १ अन्वये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत अंशदान व त्यावरील जमा व्याजाच्या रकमेचा परतावा यापैकी एक किंवा दोन्ही लाभांचे प्रदान करण्यात आले असल्यास, याबाबत कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांच्या स्तरावर प्रथम खात्री करावी.

१.२ उक्त परि.क्रं. १.१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे समुचित खात्री केल्यानंतर मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास /कायदेशीर वारसास परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेतंर्गत यापूर्वी प्रदान करण्यात आलेल्या पुढील रकमांचे प्रथम समायोजन करणे आवश्यक आहे.

(अ) केवळ शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज किंवा

(ब) केवळ सानुग्रह अनुदान रू.१० लक्ष, किंवा

(क) शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज आणि सानुग्रह अनुदान रू.१० लक्ष

१.३ कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी शासनाचे अंशदान व त्यावरील व्याजाचा तपशिल यथास्थिती विद्यापीठाचे नियंत्रक (वित्त व लेखा) यांचे कडून प्रमाणीत / पडताळणी करून घेण्यात यावी.

१.४ कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील समुचित तरतुदींस अनुसरून सादर करावयाच्या मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंब निवृत्तीवेतन व मृत्यु उपदानाच्या प्रस्तावामध्ये शासनाला येणे असलेल्या रकमा तसेच उक्त परिच्छेद १.२ मध्यें नमूद पैकी जी रक्कम समायोजन योग्य आहे. अशा रकमेचा तपशील समुचित लेखाशिर्षासह अंर्तभूत करूनच कुटुंब निवृत्तीवेतनाचा व मृत्यु उपदानाचा प्रस्ताव कुलसचिव कार्यालयाकडे मंजूरीसाठी सादर करावा. कुलसचिव कार्यालयाने प्रचलीत पध्दतीचा वापर करून प्रकरण मंजुरीची कार्यवाही करावी.

१.५ उक्त परि.१.२ मध्ये दर्शविलेली समायोजन योग्य रक्कम खालील लेखाशीर्षाखाली समायोजित करणे आवश्यक राहील. तसेच अन्य शासकीय येणे रकमांचे समायोजन समुचित लेखाशीर्षाखाली करणे आवश्यक राहील.

| अ.क्रं. | प्रवर्ग | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १ | शासनाचे अंशदान | ००७१-निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभांच्या संबंधातील अंशदानाच्या व वसुलीच्या जमा, (०१) नागरी (१०१) अभिदाने व अंशदाने, (०१) अभिदाने व अंशदाने, (०१) (१६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची समायोजनामुळे होणारी जमा रक्कम (००७१०२७१०१) |
| २ | शासनाचे अंशदानावरील व्याज | ००४९- व्याजाच्या जमा रकमा, (०४) राज्य/ संघराज्य क्षेत्र विधानमंडळ असलेल्या शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा, (८००) इतर जमा रकमा, (०१) इतर जमा रकमा, (०१) (५६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थांमधील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानावरील व्याज (००४९५२८८०१) |
| ३ | सानुग्रह अनुदानाचे समायोजन | जी-६, २०७१ निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ, (०१) नागरी, (१०३) अनुकंपा भत्ते, (००) (००) (१३) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी सलग्न संस्थातील कर्मचारी अधिकारी यांच्यासाठी परिभाषित अंशदान / राष्ट्रीय निवृत्ती वेतनेंतर्गत सानुग्रह अनुदान (अनिवार्य), (०४) निवृत्ती वेतन विषयक खर्च (२०७१०८०२) |

१.६ नियंत्रक (वित्त व लेखा) कार्यालयाकडून प्रचलीत पध्दतीचा वापर करून मृत्यु उपदान व कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान आदेश प्राप्त झाल्यानंतर कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी मृत्यु उपदानाच्या रकमेतून शासनाला येणे असलेल्या सर्व रकमा (सानुग्रह अनुदान, शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज तसेच इतर शासकीय येणे.) समुचित लेखाशिर्षाखाली समायोजन प्रस्तावीत करून देयक विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांना सादर करावे.

१.७ मृत्यु उपदानाच्या रकमेतून प्रथमत: इतर शासकीय येणे रक्कम वसूल करण्यात यावी व त्यानंतर शिल्लक मृत्यु उपदनाच्या रकमेतून सानुग्रह अनुदान, शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज याची जेवढी रक्कम समायोजित करणे शक्य आहे. तेवढी रक्कम समायोजित करून, उर्वरित सानुग्रह अनुदान, शासनाचे अंशदान व त्यावरील व्याजाची रक्कम कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानामधून समायोजित करण्याबाबत विहित कार्यपध्दती अनुसरून कार्यालय प्रमुख आणि विद्यापीठाचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी यथास्थिती विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांना कळवावे.

विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांनी कार्यालय प्रमुखाने प्रस्तावीत केलेली समायोजनाची रक्कम कुटुंब निवत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानाच्या रकमेतून समायोजित करूनच, कुटुंब निवृत्तीवेतनधारकास नियमित मासिक कुटुंब निवृत्तीवेतनाचे संवितरण सुरू करावे.

कार्यालय प्रमुखाने प्रस्तावीत केलेली समायोजनाची (सानुग्रह अनुदान, शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज) रक्कम जर कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानाच्या रकमेपेक्षा जास्त असेल, तर कुटुंब निवृत्तीवेतनाची थकबाकीची प्रथम प्रदानाची संपूर्ण रक्कम समायोजित करून, शिल्लक रक्कम पुढील कुटुंब निवृत्तीवेतनाच्या प्रदानातून टप्या-टप्याने वसूल करण्यात यावी, त्यासाठी वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-१०९९/ प्र.क्रं.९९/कोशा-४, दिनांक १२/०८/१९९९ अन्वये विहीत करण्यात आलेली कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज तसेच सानुग्रह अनुदानाची संपूर्ण रक्कम पूर्णपणे समायोजित करण्याची जबाबदारी पूर्णत: संबंधित कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

**२. परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजने अंतर्गत अंशदान व त्यावरील व्याजाच्या रकमेचा परतावा न केलेल्या प्रकरणी अनुसरावयाची कार्यपध्दती:-**

२.१ मृत कर्मचाऱ्याच्या कुटुबांस/कायदेशीर वारसास कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक मपवि २०१९ प्र.क्रं.३०/माफसु दिनांक.१८/०७/२०१९ मधील तरतुदीनुसार सानुग्रह अनुदान रू.१० लक्ष प्रदान करण्यात आले असल्यास, परंतु अद्यापपर्यंत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत अंशदान व त्यावरील व्याजाच्या रकमेचा परतावा दिला नसल्यास व सद्य:स्थितीत मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबाने कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय दिनांक २१ जुन २०२३ सोबतच्या नमुना- ३ नुसार महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ प्रमाणे कुटुंब निवृत्तीवेतनाचा लाभ देण्याबाबतच्या विकल्पाची निवड केली असल्यास, प्रथम वस्तुनिष्ठ खात्री करून संबंधित मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास/कायदेशीर वारसास परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत त्याच्या खात्यामधील एकूण जमा अंशदान व त्यावरील व्याजाच्या रकमेपैकी फक्त कर्मचाऱ्याचे स्वत:चे अंशदान व त्यावरील जमा व्याजाची रक्कम देय ठरेल.

यासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांनी कृषी पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक मपवि २०१६ प्र.क्रं.२३/माफसू दिनांक.३१/०८/२०१७ मधील तरतुदीनूसार परिपूर्ण प्रस्ताव (नमुना अ,ब,क) नियंत्रक (वित्त व लेखा) यांचेकडे सादर करावा.

२.२नियंत्रक (वित्त व लेखा) यांनी उक्त परिच्छेद २.१ मधील तरतूदीस अनुसरून त्यांचेकडे सादर झालेल्या प्रस्तावाची तपासणी करून, परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत जमा झालेल्या रकमांचे विवरणपत्र (शासन निर्णय क्रमांक मपवि २०१६ / प्र.क्रं. २३/ माफसू दिनांक ३१/०८/२०१७ सोबतचा नमुना ड व ई च्या आधारे कोषागारात देयक सादर करावे).

२.३ कोषागारातून रक्कमा प्राप्तीसाठी नियंत्रक (वित्त व लेखा) यांनी केवळ सबंधीत मृत कर्मचाऱ्याच्या खाती जमा अंशदान व त्यावरील व्याजाच्या रक्कमेसहचा निधी सबंधीत संस्थेच्या खाती उपलब्ध करून दयावा यासाठी नियंत्रक (वित्त व लेखा) यांनी अंर्थसंकल्पात पुढील लेखाशिर्षांतर्गत मागणी करावी.

| लेखाशिर्ष मराठी | लेखाशिर्ष इंग्रजी |
|---|---|
| ८३४२ इतर ठेवी<br>११७ शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अशंदान निवृत्ती योजना<br>(००) शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना<br>(००) (०७) शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती योजना- महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न असलेल्या संस्थेमधील कर्मचारी/ अधिकाऱ्यांकडून जमा केलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाचा परतावा.<br>(८३४२ ०१९५) | 8342 Other Deposits<br>117 Defined Contribution Pension Scheme For Government employees<br>(00) Defined Contribution Pension Scheme<br>(00)(07) Defined Contribution Pension Scheme Refund of Contribution collected under DCPS to Officers and Employees in the Maharashtra Animal & Fishery Sciences University, Nagpur and its Constituent Colleges<br>(8342 0195) |

२.४ आहरण व संवितरण अधिकारी यांनी नियंत्रक (वित्त व लेखा) यांचे कडून निधी प्राप्त होताच नमुना - ई च्या आधारे नमुना-४५ अ मध्ये विद्यापीठाचे कोषागारात (अधिदान व लेखाधिकारी) देयक सादर करून मृत कर्मचाऱ्याचे स्वत:चे अंशदान व त्यावरील व्याज त्याच्या कुटुंबास / वारसास प्रदान करावे.

२.५ नियंत्रक (वित्त व लेखा)/उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाने संपूर्ण आर्थिक वर्षातील सर्व परतावा प्रकरणांतील (नमुना ड प्रकरणे) शासनाचे अंशदान व त्यावरील जमा व्याजाची संपूर्ण रक्कम मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची ८३४२ ००८८ टाकून खालील लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्याकरीता निरंक देयक (Nil Bill) आर्थिक वर्षाअखेर सादर करावे.

| अ. क्र. | प्रवर्ग | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १ | शासनाचे अंशदान | ००७१-निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभांच्या संबंधातील अंशदानाच्या व वसुलीच्या जमा, (०१) नागरी (१०१) अभिदाने व अंशदाने, (०१) अभिदाने व अंशदाने, (०१) (१६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची समायोजनामुळे होणारी जमा रक्कम (००७१०२७१०१) |
| २ | शासनाचे अंशदानावरील व्याज | ००४९- व्याजाच्या जमा रकमा, (०४) राज्य/ संघराज्य क्षेत्र विधानमंडळ असलेल्या शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा, (८००) इतर जमा रकमा, (०१) इतर जमा रकमा, (०१) (५६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थांमधील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानावरील व्याज (००४९५२८८०१) |

२.६ कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील समुचित तरतुदींस अनुसरून सादर करावयाच्या मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंब निवृत्तीवेतन व मृत्यु उपदानाच्या प्रस्तावामध्ये रू.१० लक्ष सानुग्रह अनुदानाचे प्रदान केले असल्यास, सदर सानुग्रह अनुदानाची रक्कम **जी-६, २०७१ निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ, (०१) नागरी, (१०३) अनुकंपा भत्ते, (००) (००) (१३) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व**

**त्यांच्याशी सलग्न संस्थातील कर्मचारी अधिकारी यांच्यासाठी परिभाषित अंशदान / राष्ट्रीय निवृत्ती वेतनेंतर्गत सानुग्रह अनुदान** (अनिवार्य), (०४) **निवृत्ती वेतन विषयक खर्च** (२०७१०८०२) या लेखाशिर्षाखाली तसेच अन्य शासकीय येणे रकमांचे समूचीत लेखाशिर्षासह अंतभूत करूनच कुटुंब निवृत्तीवेतनाचा व मृत्यु उपदानाचा प्रस्ताव कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर कार्यालयाकडे मंजूरीसाठी सादर करावा. कुलसचिव कार्यालयाने प्रचलीत पध्दतीनुसार कुटूंब निवृत्तीवेतन मंजुरीची कार्यवाही करावी.

२.७ नियंत्रक (वित्त व लेखा) कार्यालयाकडून मृत्यु उपदान व कुटुंब उपदान व कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान आदेश प्राप्त झाल्यानंतर कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी मृत्यु उपदानाच्या रकमेतून शासनाला येणे असलेल्या सर्व रकमा (सानुग्रह अनुदान व इतर शासकीय येणे) समुचित लेखाशिर्षाखाली समायोजन प्रस्तावीत करून देयक विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी कार्यालयात सादर करावा.

२.८ मृत्यु उपदानाच्या रकमेतून प्रथमत: इतर शासकीय येणे रक्कम वसूल करण्यात यावी व त्यानंतर शिल्लक मृत्यु उपदानाच्या रकमेतून सानुग्रह अनुदानाची जेवढी रक्कम समायोजित करणे शक्य आहे. तेवढी रक्कम समायोजित करून, उर्वरित सानुग्रह अनुदानाची रक्कम कुटुंब निवत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानामधून समायोजित करणेबाबत विहित कार्यपध्दती अनुसरून कार्यालय प्रमुख आणि संबधीत संस्थेतील विद्यापीठाचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी यथास्थिती विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी (विद्यापीठाचे कोषागार) यांना कळवावे.

विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांनी कार्यालय प्रमुखाने प्रस्तावित केलेली रक्कम कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानाच्या रकमेतून समायोजित करूनच कुटुंब निवृत्तीवेतनधारकास नियमित मासिक कुटुंब निवृत्तीवेतनाचे संवितरण सुरू करावे.

कार्यालय प्रमुखाने प्रस्तावित केलेली समायोजनाची (सानुग्रह अनुदान) रक्कम जर कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानाच्या रकमेपेक्षा जास्त असेल. तर कुटुंब निवृत्तीवेतनाची थकबाकीची प्रथम प्रदानाची संपूर्ण रक्कम समायोजित करून, शिल्लक रक्कम पुढील कुटुंब निवृत्तीवेतनाच्या प्रदानातून टप्पा-टप्याने वसूल करण्यात यावी. त्यासाठी वित्त विभाग, शासन परिपत्रक संकीर्ण-१०९९ / प्र.क्रं.९९ / कोश.४ दिनांक १२.०८.१९९९ विहित करण्यात आलेली कार्यपध्दती अनुसरण्यात यावी. संकीर्ण-१०९९/प्र.क्रं.९९/कोश.४ दिनांक.१२.०८.१९९९ अन्वये सानुग्रह अनुदानाची संपूर्ण रक्कम समायोजित करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुख आणि संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

**ब) राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली लागू असलेले कर्मचारी :-**

**१. राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत PRAN खात्यामध्ये जमा संचित रकमेचे प्रदान करण्यात आलेल्या प्रकरणी अनुसरावयाची कार्यपध्दती:**

१.१ मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास /कायदेशीर वारसास कृषी व पदुम विभाग शासन निर्णय,क्रमांक संकीर्ण मपवि२०१९/प्र.क.३०/माफसू, दि. १८/०७/२०१९ मधील तरतुदीनुसार सानुग्रह अनुदान रू.१०.०० लक्ष प्रदान करण्यात आले असल्यास तसेच Pension Fund Regulatory and Development Authority (Exits and Withdrawals Under the National Pension System) Regulations २०१५ आणि त्यामध्ये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणांन्वये कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये जमा संचित रकमेचे प्रदान Exit Withdrawal Process द्वारे करण्यात आले असल्यास, याबाबत कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांचे स्तरावर प्रथमखात्री करावी.

१.२ ज्याप्रकरणी PRAN खात्यामधील संचित रकमेमधून वार्षिकी योजना (Annuity Plan) खरेदी करण्याची कार्यवाही मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबियाकडून /कायदेशीर वारसांकडून यापूर्वीच पूर्ण करण्यात आलेली असेल आणि संबंधितांना वार्षिकीचे (Annuity) नियमित प्रदान देखील सुरू झालेले असेल, अशा प्रकरणी निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकारण (PFRDA) यांचे परिपत्रक PFRDA/२०२१/३०/SUP/ASP/६, दिनांक २२.०७.२०२१ अन्वये वार्षिक समर्पित (surrender) करण्या संदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सुचनांस अनुसरून विचारपुर्वक यथोचित निर्णय घेण्याची मुभा संबंधित मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबियांना/कायेदशीर वारसांना असेल. वार्षिकी समर्पण (surrender) करणे किंवा न करणेबाबत मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबियांना/कायदेशीर वारसांना कोणताही निर्णय घेतला तरी, मृत्यु समयीमृत कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये जी एकूण संचित रक्कम होती त्या एकूण संचित जमा रकमेतील केवळ शासनाचे अंशदान व त्यावरील जमा लाभाच्या रकमेचे समायोजन कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी करणे अनिवार्य राहील.

१.३ उक्त परि.क्रं.१.१ नुसार समुचित खात्री केल्यानंतर मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास/कायदेशीर वारसास राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत यापूर्वी प्रदान करण्यात आलेल्या पुढील रकमांचे प्रथम समायोजन करणे आवश्यक आहे.

(अ) मृत्युसमयी कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये जमा एकूण संचित रकमेतील केवळ शासनाचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम, किंवा

(ब) केवळ सानुग्रह अनुदान रू.१०.०० लक्ष, किंवा

(क) मृत्युसमयी कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये जमा एकूण संचित रकमेतील केवळ शासनाचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम, आणि सानुग्रह अनुदान रू.१०.०० लक्ष.

१.४ मृत्युसमयी कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये जमा एकूण संचित रकमेतील केवळ शासनाचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम याबाबत तपशिल संबंधित कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखाधिकारी यांनी प्रमाणीत केलेल्या माहीती नियंत्रक (वित्त व लेखा), मपमविवि, नागपूर या कार्यालयामार्फत केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून (CRA- Protean) प्राप्त करून घ्यावा.

१.५ कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील समुचित तरतुदीस अनुसरून सादर करावयाच्या मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंब निवृत्तीवेतन प्रस्तावामध्ये शासनाला येणे असलेल्या अन्य रकमा तसेच उक्त परिच्छेद १.३ मध्ये नमूद पैकी जी रक्कम समायोजन योग्य आहे. अशा रकमेचा तपशील समुचित लेखाशिर्षासह अंतर्भूत करूनच कुटुंब निवृत्तीवेतन व मृत्यु उपदानाचा प्रस्ताव कुलसचिव कार्यालयाकडे मंजूरीसाठी सादर करावा. कुलसचिव कार्यालयाने प्रचलीत पध्दतीचा वापर करून प्रकरण मंजुरीची कार्यवाही करावी.

१.६ उक्त परि.क्रं.१.३ मध्ये दर्शविलेल्या समायोजन योग्य रक्कम खालील लेखाशीर्षाखाली समायोजित करणे आवश्यक राहील. तसेच अन्य शासकीय येणे रकमांचे समायोजन समुचित लेखाशीर्षाखाली करणे आवश्यक राहील.

| क्र. | प्रवर्ग | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १ | शासनाचे अंशदान | ००७१-निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभांच्या संबंधातील अंशदानाच्या व वसुलीच्या जमा, (०१) नागरी (१०१) अभिदाने व अंशदाने, (०१) अभिदाने व अंशदाने, (०१) (१६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची समायोजनामुळे होणारी जमा रक्कम (००७१०२७१०१) |
| २ | शासनाचे अंशदानावरील व्याज | ००४९- व्याजाच्या जमा रकमा, (०४) राज्य/ संघराज्य क्षेत्र विधानमंडळ असलेल्या शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा, (८००) इतर जमा रकमा, (०१) इतर जमा रकमा, (०१) (५६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थांमधील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानावरील व्याज (००४९५२८८०१) |
| ३ | सानुग्रह अनुदानाचे समायोजन | जी-६, २०७१ निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ, (०१) नागरी, (१०३) अनुकंपा भत्ते, (००) (००) (१३) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी सलग्न संस्थातील कर्मचारी अधिकारी यांच्यासाठी परिभाषित अंशदान / राष्ट्रीय निवृत्ती वेतनेंतर्गत सानुग्रह अनुदान (अनिवार्य), (०४) निवृत्ती वेतन विषयक खर्च (२०७१०८०२) |

१.७ नियंत्रक (वित्त व लेखा), मपमविवि, नागपूर या कार्यालयाकडून प्रचलीत पध्दतीचा वापर करून मृत्यु उपदान व कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान आदेश प्राप्त झाल्यानंतर कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी मृत्यु उपदानाच्या रकमेतून शासनाला येणे असलेल्या सर्व रकमा (सानुग्रह अनुदान, शासनाचे अंशदान व त्यावरील लाभ तसेच इतर शासकीय येणे) समुचित लेखाशिर्षाखाली समायोजन प्रस्तावित करून देयक विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांचे कडे सादर करावे.

१.८ मृत्यु उपदानाच्या रकमेतून प्रथमत: इतर शासकीय येणे रक्कम वसूल करण्यात यावी व त्यानंतर शिल्लक मृत्यु उपदानाच्या रकमेतून सानुग्रह अनुदानाची जेवढी रक्कम समायोजित करणे शक्य आहे, तेवढी रक्कम समायोजित करून, उर्वरित सानुग्रह अनुदान, शासनाचे अंशदान व त्यावरील व्याजाची रक्कम कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानामधून समायोजित करणेबाबत विहित कार्यपध्दती अनुसरून कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी यथास्थिती नियंत्रक (वित्त व लेखा) मपमविवि, नागपूर यांना कळवावे.

कार्यालय प्रमुखाने/आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तावित केलेली समायोजनाची रक्कम विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांनी कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानाच्या रकमेतून समायोजित करूनच कुटुंब निवृत्तीवेतनधारकास नियमित मासिक कुटुंब निवृत्तीवेतनाचे संवितरण सूरू करावे.

कार्यालय प्रमुखाने/आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तावित केलेली समायोजनाची (सानुग्रह अनुदान, शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज) रक्कम जर कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानाच्या रकमेपेक्षा जास्त असेल तर कुटुंब निवृत्तीवेतनाची थकबाकीची प्रथम प्रदानाची संपूर्ण रक्कम समायोजित करून, शिल्लक रक्कम पुढील कुटुंब निवृत्तीवेतनाच्या प्रदानातून टप्पा-टप्पाने वसूल करण्यात यावी. त्यासाठी वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण १०९९ / प्र.क्र.९९/कोशा-४ दिनांक१२/०८/१९९९ अन्वये विहित करण्यात आलेली कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

शासनाचे अंशदान व त्यावरील लाभ तसेच सानुग्रह अनुदानाची संपूर्ण रक्कम पूर्णपणे समायोजित करण्याची जबाबदारी पूर्णत: संबंधित कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

**२. राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत PRAN खात्यामध्ये जमा एकूण संचित रकमेचे प्रदान न केलेल्या प्रकरणी अनुसरावयाची कार्यपध्दती**

२.१ मृत्य कर्मचाऱ्याच्या कुटुंबास/कायदेशीर वारसास कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक मपवि/२०१९/प्र.क्रं.३०/माफसू दिनांक १८.०७.२०१९ मधील तरतुदीनुसार सानुग्रह अनुदान रू.१०.०० लक्ष प्रदान करण्यात आले असल्यास, परंतु मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास/कायदेशीर वारसास अद्यापपर्यंत राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत Exit Withdrawal Process द्वारे जमा संचित रकमेचे प्रदान करण्यात आले नसल्यास व सद्य: स्थितीत मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबाने पदुम विभाग शासन निर्णय मपवि २०२३/प्र.क्र.१२४/पदुम २, दि. २१/०६/२०२३ सोबतच्या नमुना-३ नुसार महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ प्रमाणे कुटुंब निवृत्तीवेतनाचा लाभ देण्याबाबतच्या विकल्पाची निवड केली असल्यास, अशा प्रकरणी संबंधीत मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास/कायदेशीर निवड वारसास मृत कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये मृत्युसमयी जमा असलेल्या एकूण संचित जमा रकमेपैकी मृत कर्मचाऱ्याचे स्वत:चे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम देय ठरेल.

यासाठी कार्यालय प्रमुख/आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यामध्ये मृत्युसमयी जमा असलेली संचित रक्कम परत मागविण्यासाठी निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकारण (PFRDA) यांचे Exit and Withdrawal Under the Naitional Pension System regulation २०१५ मधील विनियम ६ (ई) व तदनंतर वेळोवेळी सुधारणा झालेल्या तरतुदीनुसार आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधीत मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबाकडून विहीत नमुन्यात माहिती प्राप्त करुन आवश्यक कागदपत्रांसह Online Family Pension Exit Withdrawal चा प्रस्ताव नियंत्रक (वित्त व लेखा), मपमविवि, नागपूर कार्यालयाकडे परिपूर्ण प्रस्ताव सादर करावा.

२.२ कार्यालय प्रमुख/आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या आधारे नियंत्रक (वित्त व लेखा) मपमविवि कार्यालय यांनी केद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA- Protean) प्रणालीवर Online Family Pension Exit Withdrawal ला मंजूरी द्यावी. मृत कर्मचाऱ्याच्या PRAN खात्यातील संचित रकमेतील कर्मचाऱ्याचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम आणि शासनाचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम याची स्वतंत्र परिगणना केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण (CRA- Protean) यांचेकडून घेण्यात यावी.

२.३ नियंत्रक (वित्त व लेखा) मपमविवि कार्यालयांनी शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज खालील लेखाशिर्षाखाली शासन खाती तात्काळ जमा करावी. कर्मचाऱ्याचे अंशदान व त्यावरील जमा लाभाची रक्कम संबंधित विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांच्या खात्यावर वर्ग करण्यात यावी. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेचे प्रदान मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास/वारसास प्रदान करण्यासाठीची पुढील कार्यवाही करण्यात यावी.

| क्र. | प्रवर्ग | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १ | शासनाचे अंशदान | ००७१-निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभांच्या संबंधातील अंशदानाच्या व वसुलीच्या जमा, (०१) नागरी (१०१) अभिदाने व अंशदाने, (०१) अभिदाने व अंशदाने, (०१) (१६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची समायोजनामुळे होणारी जमा रक्कम (००७१०२७१०१) |
| २ | शासनाचे अंशदानावरील व्याज | ००४९- व्याजाच्या जमा रकमा, (०४) राज्य/ संघराज्य क्षेत्र विधानमंडळ असलेल्या शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा, (८००) इतर जमा रकमा, (०१) इतर जमा रकमा, (०१) (५६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थांमधील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानावरील व्याज (००४९५२८८०१) |

२.४. कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील समुचित तरतुदीस अनुसरून सादर करावयाच्या मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंब निवृत्तीवेतनाच्या आणि मृत्यु उपदानाच्या प्रस्तावामध्ये मृत कर्मचाऱ्याच्या कुटुंबास सानुग्रह अनुदानाची रू.१०.०० लक्ष प्रदान केली असल्यास, सदर सानुग्रह अनुदानाची **रक्कम जी-६, २०७१ निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ**, (०१) **नागरी**, (१०३) **अनुकंपा भत्ते**, (००) (००) (१३) **महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी सलग्न संस्थातील कर्मचारी अधिकारी यांच्यासाठी परिभाषित अंशदान / राष्ट्रीय निवृत्ती वेतनेंतर्गत सानुग्रह अनुदान** (**अनिवार्य**), (०४) **निवृत्ती वेतन विषयक खर्च** (**२०७१०८०२**) या लेखाशिर्षाखाली व अन्य शासकीय येणे रकमांचे समायोजन समुचित लेखाशिर्षासह अंतर्भूत करूनच कुटुंब निवृत्तीवेतनाचा आणि मृत्यु उपदानाचा प्रस्ताव कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर कार्यालयाकडे मंजूरीसाठी सादर करावा. कुलसचिव कार्यालयाने प्रचलीत पध्दतीने कुटूंब निवृत्ती वेतन मंजुरीची कार्यवाही करावी.

२.५. नियंत्रक (वित्त व लेखा), महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर कार्यालयाकडून प्रचलीत पध्दतीचा वापर करून मृत्यु उपदान व कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान आदेश प्राप्त झाल्यानंतर कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी मृत्यु उपदानाच्या रकमेतून शासनाला येणे असलेल्या सर्व रकमा (सानुग्रह अनुदानासह) समुचित लेखाशिर्षा खाली समायोजन प्रस्तावित करून देयक विद्यापीठाचे अधिदान व लेखा कार्यालयात सादर करावे.

२.६. मृत्यु उपदानाच्या रकमेतून प्रथमत: इतर शासकीय येणे वसूल करण्यात यावे व त्यानंतर शिल्लक मृत्यु उपदानाच्या रकमेतून सानुग्रह अनुदानाची रक्कम कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानामधून समायोजित करणेबाबत विहित कार्यपध्दती अनुसरून कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी यथास्थिती अधिदान व लेखाअधिकारी यांना कळवावे.

विद्यापीठाचे अधिदान व लेखाधिकारी यांना कार्यालय प्रमुखाने प्रस्तावीत केलेली समायोजनाची रक्कम कुटूंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या प्रथम प्रदानाच्या रक्कमेतून समायोजीत करूनच कुटुंब निवृत्तीवेतनधारकास नियमित मासिक कुटुंब निवृत्तीवेतनाचे संवितरण सूरू करावे.

कार्यालय प्रमुखाने प्रस्तावित केलेली समायोजनाची (सानुग्रह अनुदान) रक्कम जर कुटुंब निवृत्तीवेतनाच्या थकबाकीच्या रकमेपेक्षा जास्त असेल, तर कुटुंब निवृत्तीवेतनाची थकबाकीची संपूर्ण रक्कम समायोजित करून, शिल्लक रक्कम पुढील कुटुंब निवृत्तीवेतनाच्या प्रदानातून टप्या-टप्याने वसूल करण्यात यावी. त्यासाठी वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-१०९९ /प्र.क्र.९९/कोषा-४, दिनांक १२.०८.१९९९ अन्वये विहित करण्यात आलेली कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

सानुग्रह अनुदानाची संपूर्ण रक्कम पूर्णपणे समायोजित करण्याची जबाबदारी पूर्णत: संबंधित कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

----

## परिशिष्ट-२

**कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्रमांक: मपवि-२०२३/प्र.क्र.१२४/पदूम-२, दिनांक २१ जुन,** २०२३ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदीस अनुसरून परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत रूग्णता निवृत्त झालेला कर्मचारी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ अंतर्गत रूग्णता निवृत्तीवेतनास पात्र ठरल्यास व सदर कर्मचाऱ्यांनी रूग्णता निवृत्तीवेतन या विकल्पाची (नमुना-३ नुसार) निवड केली असल्यास सदर विकल्पास अनुसरून अवलंबवयाची कार्यपध्दती.

**अ) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेले कर्मचारी**

**१. परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत अंशदान व त्यावरील जमा व्याजाचा रकमेचा परतावा करण्यात आलेल्या प्रकरणी अनुसरावयाची कार्यपध्दती:-**

१.१ रूग्णता निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यास कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्रमांक: मपवि-२०१६/प्र.क्र.२३/माफसु दिनांक ३१/०८/२०१७ परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत अंशदान व त्यावरील जमा व्याजाच्या रकमेचा परतावा करण्यात आला असल्यास, याबाबत कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांचे स्तरावर प्रथम खात्री करावी.

१.२ उक्त परि.क्रं. १.१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे समुचित खात्री केल्यानंतर रूग्णता निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यास परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेतंर्गत यापूर्वी शासनाचे अंशदान व त्यावरील व्याजप्रदान करण्यात आले असल्यास प्रथम सदर रकमेचे समायोजन करणे आवश्यक आहे.

१.३ कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी शासनाचे अंशदान व त्यावरील व्याजाचा तपशिल नियंत्रक (वित्त व लेखा) तथा उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून प्राप्त करून घ्यावा.

१.४ कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील समुचित तरतुदीस अनुसरून सादर करावयाच्या रूग्णता निवृत्तीवेतन व सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रस्तावामध्ये शासनाला येणे असलेल्या समायोजन योग्य अन्य रकमा तसेच उक्त परिच्छेद १.२ मध्ये नमूद रक्कम याबाबतचा तपशील लेखाशिर्षासह अंतर्भूत करूनच रूग्णता निवृत्ती उपदानाचा प्रस्ताव मंजूरीसाठी कुलसचिव, मपमविवि यांचे कडे सादर करावा. कुलसचिव कार्यालयाने प्रचलीत पध्दतीने प्रस्तावास मान्यतेची कार्यवाही करावी.

१.५ उक्त परि.१.४ मध्ये दर्शविलेल्या समायोजन योग्य रकमेपैकी शासनाचे अंशदान खालील लेखाशिर्षाखाली समायोजित करणे आवश्यक राहील. तसेच अन्य शासकीय येणे रकमेचे समायोजन समुचित लेखाशिर्षाखाली करणे आवश्यक राहील.

| अ.क्र. | प्रवर्ग | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १ | शासनाचे अंशदान | ००७१-निवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभांच्या संबंधातील अंशदानाच्या व वसुलीच्या जमा, (०१) नागरी (१०१) अभिदाने व अंशदाने, (०१) अभिदाने व अंशदाने, (०१) (१६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना/ राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानाची समायोजनामुळे होणारी जमा रक्कम (००७१०२७१०१) |
| २ | शासनाचे अंशदानावरील व्याज | ००४९- व्याजाच्या जमा रकमा, (०४) राज्य/ संघराज्य क्षेत्र विधानमंडळ असलेल्या शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा, (८००) इतर जमा रकमा, (०१) इतर जमा रकमा, (०१) (५६) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थांमधील कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत शासनाच्या अंशदानावरील व्याज (००४९५२८८०१) |

